**केंद्र पुरस्कृत बहुक्षेत्र विकास कार्यक्रमातंर्गत (MsDP) मान्यता प्राप्त जालना जिल्ह्यातील जालना शहर येथील विकासकामांच्या बांधकामाकरीता राज्य हिश्यांतर्गत मंजूर अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०१३ /प्र.क्र.१७८/का.०७,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
दिनांक: - १९/०३/२०२०

**संदर्भ:-**

१. अवर सचिव,अल्पसंख्याक कार्य मंत्रालय,भारत सरकार,नवी दिल्ली यांची पत्रे क्र.३/१३ (२) & (३)/२०१३-PP, दि.२९/१०/२०१४ व दि.२९/१२/२०१५.
२. शासन ज्ञापन,अविवि-२०१३/प्रक्र.१७८/का.०७ दिनांक २७/०३/२०१५.
३. शासन निर्णय क्रमांक,अविवि-२०१३/प्रक्र.१७८/का.०७ दि.३१/०३/२०१५.
४. शासन ज्ञापन,अविवि-२०१३/प्रक्र.१७८/का.०७ दिनांक १६/०६/२०१५.
५. शासन ज्ञापन,अविवि-२०१३/प्रक्र.१७८/का.०७ दिनांक २८/०७/२०१५.
६. शासन निर्णय,अविवि-२०१३/प्रक्र.१७८/का.०७ दिनांक २८/०७/२०१५.
७. शासन निर्णय अविवि-२०१४/प्रक्र.१४१/का.०७ दिनांक ३१/०३/२०१६.
८. शासन निर्णय अविवि-२०१४/प्रक्र.१४१/का.०७ दिनांक ३०/०४/२०१६.
९. शासन निर्णय क्र.अविवि-२०१४/प्रक्र.१४१/का.०७ दि.२३/०५/२०१६.
१०. शासन निर्णय क्रमांक,अविवि-२०१३/प्रक्र.१७८/का.०७ दि.२८/०६/२०१६.
११.अवर सचिव,अल्पसंख्याक कार्य मंत्रालय,भारत सरकार,नवी दिल्ली यांची पत्रे क्र.१३/२४/२०१७-MsDP-MoMA, दि.३०/११/२०१७
१२.शासन निर्णय क्रमांक अविवि-२०१३/प्रक्र.१७८/का.०७ दि.३१/०१/२०१८.
१३.जिल्हाधिकारी जालना यांचे पत्र क्र.अ.शा.२०१९/अल्पसंख्याक/कावि,दि१४/१२/२०१९.

**प्रस्तावना :-**

१२ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र शासनाच्या अल्पसंख्यांक कार्य मंत्रालयाने बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमाअंतर्गत (MsDP) गठित शक्तीप्रदान समितीने दि.०१/०९/२०१४ रोजीच्या ८९ व्या व दिनांक १४/१२/२०१५ रोजीच्या १०९ व्या बैठकीत जालना शहर, जि.जालना येथे मुलांसाठी १०० प्रवेशक्षमतेचे १ वसतीगृह (विद्युतीकरणासह), मिल्लतनगर व गांधीनगर, जालना येथील शाळा इमारती बांधकामाच्या (स्वच्छतागृहासह) आणि मुलींसाठी १०० प्रवेश क्षमतेचे १ वसतीगृह अशा प्रस्तावास मान्यता दिली आहे.

२. केंद्रशासनाच्या अल्पसंख्यांक कार्य मंत्रालयाने दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने संदर्भ क्रमांक (२) ते (५) येथील शासन ज्ञापनांव्दारे जालना शहर, जि. जालना येथे मुलां-मुलींसाठी १०० प्रवेशक्षमतेचे प्रत्येकी १ याप्रमाणे एकूण २ वसतीगृह आणि मिल्लतनगर व गांधीनगर, जालना येथील शाळा इमारत बांधकामास (स्वच्छतागृहासह) मिळून एकूण रू.९१२.२३ लाख इतक्या रकमेची प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.सदरहू प्रशासकिय मान्यतेस अनुसरुन संदर्भ क्र.(७), (८) व (१२) अन्वये केंद्र व राज्य हिश्श्यातील पहिल्या व दुसऱ्या टप्यातील एकूण रु.६६३.०३ लाख इतका निधी विषयांकीत कामांच्या प्रयोजनासाठी जिल्हाधिकारी, जालना यांना मंजूर करुन वितरित करण्यात आला आहे. आता सदर बांधकामे अंतीम टप्प्यात असून उर्वरीत बांधकामाकरीता **एकूण रू.२४७.२५ लाख इतका निधी वितरीत करणेबाबत जिल्हाधिकारी, जालना यांनी संदर्भ क्र.१३ अन्वये शासनाकडे**

**प्रस्ताव सादर केला आहे.सदर निधीमध्ये रू.९.९३ लाख इतका केंद्रीय निधी अंतर्भूत असून सदर निधी वितरीत करणेबाबत केंद्र शासनास विनंती करण्यात येत आहे. सदर निधी केंद्र शासनाकडून प्राप्त होताच स्वतंत्रपणे वितरीत करण्यात येईल. सबब सद्य:स्थितीत** राज्य हिश्श्यांतर्गत उर्वरित रु.२३७.३२ लाख (**रू.२४७.२५ लाख वजा रू.९.९३ लाख** ) इतका निधी **जिल्हाधिकारी, जालना यांना वितरीत** करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

३. अल्पसंख्याक बहु क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत (MsDP) जालना शहर,जि.जालना येथे मुला-मुलींसाठी १०० प्रवेशक्षमतेचे प्रत्येकी १ याप्रमाणे एकूण २ वसतीगृह आणि मिल्लतनगर व गांधीनगर, जालना येथील शाळा इमारत बांधकाम (स्वच्छतागृहासह) या बांधकामांस प्रशासकिय मान्यतेनुसार राज्य हिश्श्यातील खालील तक्त्यातील स्तंभ क्र. (१२) प्रमाणे निधी मंजूर करुन वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

(Rs. lakhs)

| अ.क्र | कामाचे नाव | युनिट संख्या | युनिट किंमत | प्रशासकीय मान्यता | निधी प्रमाण | हिस्सा | | वितरीत पहिला व दुसरा हप्ता | | सन २०१९-२० करीता वितरीत करावयाचा राज्य हिस्सा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | केंद्र | राज्य | केंद्र | राज्य | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | १० | ११ | १२ |
| १ | १०० अल्पसंख्याक मुलांचे वसतीगृह | ०१ | ३१०.०० | ४१४.४७ | ५०:५० | १५५.०० | १५५.०० | १५५.०० | १५५.०० | ५६.६५ |
| २ | शाळा इमारत बांधकाम (गांधी नगर व मिल्लत नगर) | ०२ | २६.४९ | ३८.७८ | ७५:२५ | ३९.७२ | १३.२४ | २९.७९ | १३.२४ | २८.८५ |
| ३ | १०० अल्पसंख्याक मुलींचे वसतीगृह | ०१ | ३१०.०० | ४२०.२३ | ६०:४० | १८६.०० | १२४.०० | १८६.०० | १२४.०० | १५१.८२ |
| | **एकूण** | | **६७२.९८** | **९१२.२३** | | **३८०.७२** | **२९२.२४** | **३७०.७९** | **२९२.२४** | **२३७.३२** |

४. उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(१२) प्रमाणे सन २०१९-२० या वर्षात अल्पसंख्याक बहु क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत जालना जिल्ह्यातील जालना शहर येथील उक्त तक्त्यात नमुद विकासकामांसाठी राज्य हिश्श्यातील रु.२३७.३२ लाख इतकी रक्कम जिल्हाधिकारी, जालना यांना सुपूर्द करण्यात येत असून याकरीता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

५. सन २०१९-२० या वर्षात जिल्हाधिकारी, जालना यांना उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र. (१२) प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या एकूण रकमेच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून सदर रक्कम आहरित व संवितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. जिल्हाधिकारी, जालना यांनी अल्पसंख्याक बहु क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत विषयांकित ०२ वसतीगृह, ०२ शाळा इमारत बांधकामासाठी या योजनेकरीता आहरित केलेली रक्कम संबंधित अमंलबजावणी यंत्रणेस रितसर वितरित करण्यात यावी.

६. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता संबंधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी संबंधित जिल्हाधिकारी यानी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब

करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

७. अमंलबजावणी यंत्रणा यांनी विषयांकीत ०१ मुलांचे वसतीगृह. ०१ मुलींचे वसतीगृह व ०२ शाळा बांधकाम (स्वच्छतागृहासहित) बांधकामासाठी केंद्र व राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) विहित नमुन्यात (अद्ययावत छायाचित्रांसह) संबंधीत जिल्हाधिकारी यांच्यामार्फत शासनास सादर करावीत. तसेच विभागाच्या Construction tracker प्रणालीवर देखील विषयांकीत वसतीगृह बांधकामाची माहिती वेळोवेळी upload करावी.

८. जिल्हाधिकारी, जालना यांनी विषयांकीत ०२ वसतीगृह, ०२ शाळा इमारत (स्वच्छतागृहासहित) बांधकामासाठी निधी मागणीच्या प्रस्तावासोबत वरीलप्रमाणे विहित नमुन्यातील निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) (अद्ययावत छायाचित्रासह) शासनास सादर करावीत.

९. सदर योजनेंतर्गत केंद्र हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्र.झेड ई-१, मुख्यलेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (००) (१७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना, (केंद्र हिस्सा) (२२३५- ए ५४३) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली व राज्य हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्र.झेड ई-१, मुख्यलेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१) (१४) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना, ( राज्य हिस्सा) (२२३५-ए २३१ ) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

१०. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८/०६/२०१९ अन्वये प्रशासनिक विभागांस प्रदान करण्यात आलेल्या अधिकांरानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२००३१९१११११४१८६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2020.03.19 11:14:30 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग (बांधकामे), मंत्रालय, मुंबई.
२. जिल्हाधिकारी, जालना.
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद.
४. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद.
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जालना.
६. महालेखापाल,महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
७. महालेखापाल,महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर.

८. मुख्याधिकारी, जालना नगरपरिषद, जि. जालना.
९. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन,पाचवा मजला, मुंबई
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा जालना.
११. वित्त विभाग (अर्थसंकल्प -४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई.
१२. नियोजन विभाग (कार्या.१४७५)
१३. निवड नस्ती (का.७)